तत्काळ

मुदतपूर्व सेवानिवृत्ती विरुध्द सादर केलेल्या अभिवेदनांवर विचार करण्यासाठी अवलंबियाची यावयाची कार्यपध्दति.

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक, क्रमांक-एसआरसी-१०८८/प्र क्र १/पंधरा,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक :-१९ फेब्रुवारी, १९८८.

## प रि प त्र क

महाराष्ट्र नागरी सेवा [निवृत्तीवेतन] नियम, १९८२ च्या नियम १० [४] व नियम ६५ मधील तरतुदींनुसार ज्या शासकीय कर्मचा-यांना/अधिका-यांना मुदतपूर्व सेवानिवृत्त करण्यात येते, अशा कर्मचारी/अधिका-यांकडून कांही-वेळा त्यांच्या मुदतपूर्व सेवानिवृत्ती विरुध्द अभिवेदने सादर करण्यात येतात. अशी अभिवेदने विचारात घेण्यासाठी कोणत्या कार्यपध्दतीचा अवलंब करण्यात यावा, याबाबतच्या सूचना शासन परिपत्रके, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-एसआरसी-१०७६/५८०/१५, दिनांक २५ मार्च, १९७६, ८ एप्रिल, १९७६, २४ जून, १९७६, ६ ऑगस्ट, १९७६ व १५ नोव्हेंबर, १९७६ अन्वये देण्यात आलेल्या आहेत. सदर परिपत्रकांच्या प्रती तत्काळ संदर्भासाठी सोबत जोडल्या आहेत.

२. याबाबत असे निदर्शनास आले आहे की, शासकीय कर्मचारी/अधिका-यांकडून त्यांच्या मुदतपूर्व सेवानिवृत्ती विरुध्द सादर करण्यात आलेली अभिवेदने सामान्य प्रशासन विभागाकडे पाठवितांना संबंधित मंत्रालयीन विभागांकडून जरुर ती पूरक माहिती अशा अभिवेदनासोबत पाठविली जात नाही. परिणामी अशी माहिती गोळा करण्यामध्ये कालापव्यय होऊन अभिवेदनांवर निर्णय होण्यास विलंब होतो. मुदतपूर्व सेवानिवृत्ती विरुध्द सादर केलेल्या अभिवेदनांच्या संदर्भात करण्यात येणा-या कार्यवाहीबाबत सुसूत्रता असावी म्हणून सर्व मंत्रालयीन विभागांना अशी विनंती करण्यात येते की, शासकीय कर्मचारी/अधिका-यांनी मुदतपूर्व सेवानिवृत्ती विरुध्द सादर केलेली अभिवेदने सामान्य प्रशासन विभागाकडे पाठवितांना सोबतच्या प्रपत्रामध्ये विहीत केलेली माहिती स्पष्टपणे भरुन अशा अभिवेदनासोबत ती [वर्ग-१ अधिका-यांबाबत १० प्रती व वर्ग-२ अधिका-यांबाबत २ प्रतीत] सामान्य प्रशासन विभागाकडे पाठविण्यात यावी.

3. उलट संदर्भ टाळण्यासाठी सर्व मंत्रालयीन विभागांनी वरील सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे अशी विनंती करण्यात येत आहे.

४. मुदतपूर्व सेवानिवृत्ती विरुध्द सादर केलेल्या अभिवेदनावर लवकरात लवकर निर्णय घेणे शक्य व्हावे म्हणून सर्व मंत्रालयीन विभागांना अशीही विनंती आहे की,-

अशा अभिवेदनांबाबत जरूर ती कार्यवाही तातडीने करण्याची दक्षता घेण्यात यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

मु. स. मोकाशी

[मु. स. मोकाशी]
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

शासनाचे सर्व सचिव,
सर्व मंत्रालयीन विभाग [प्रत्येकी ५ अतिरिक्त प्रतींसह]

गोपनीय

# प्रपत्र

## – मुदतपूर्व सेवानिवृत्ती विरूध्द सादर केलेले अभिवेदन –

---

१] अधिकारी/कर्मचा-याचे नांव व हुद्दा :

२] विभाग :

३] जन्मदिनांक :

४] अभिवेदन विहित मुदतीत मिळाले आहे काय :

५] संबंधित अधिकारी शारिरीकदृष्टया सेवेत राहण्यास पात्र आहेत काय :

६] संबंधित अधिका-याच्या सचोटीबाबत विभागाचे अभिप्राय :

७] संबंधित अधिका-यांच्या शासन सेवेत चालू ठेवण्याबाबतच्या पात्रतेसंबंधी मंत्रालयीन विभागाच्या सचिवाचे अभिप्राय :

८] संबंधित अधिकारी/कर्मचारी मुदतपूर्व सेवानिवृत्ती विरूध्द न्यायालयामध्ये गेले असल्यास न्यायालयाचे यासंबंधीचे आदेश :

९] अभिवेदनावर प्रशासकीय विभागाचे अभिप्राय :

---

| अभिवेदनामध्ये उपस्थित केलेले मुद्दे [थोडक्यात] | प्रशासकीय विभागाचे अभिप्राय |
|---|---|
| [१] | [२] |